भिवंडी निजामपूर शहर महानगरपालिकेच्या घरगुती प्रयोजनासाठीच्या बिगर सिंचन पाणी आरक्षणास विशेष बाब म्हणून पुढील सहा वर्षासाठी मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक. बिसिंआ २०१९/(३५०/१९)/सिं.व्य.(धो-२)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०८ ऑक्टोबर, २०२१

**संदर्भ** : - १) मुख्य अभियंता, कोकण प्रदेश , मुंबई यांचे दि.०७/०१/२०२० रोजीचे पत्र
२) शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१३/(४१५/१३)/सिंव्य (धोरण) दि. १६/८/२०१४
३) शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१५/(४४/१५)/सिंव्य (धोरण) दि. १७/११/२०१६
४) शासन निर्णय क्र. देवदु २०१५/(८३६/१५)/सिंव्य (कामे) दि. १७/११/२०१६
५) शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१८/(५११/१८)/सिंव्य (धोरण) दि. ०१/१२/२०१८

**प्रस्तावना:-**

संदर्भिय पत्र क्र. १ अन्वये मुख्य अभियंता, कोकण प्रदेश , मुंबई यांचेकडून भातसा प्रकल्पातून भिवंडी निजामपूर शहर महानगरपालिकेच्या घरगुती प्रयोजनासाठी निभावणी साठयातून विगर सिंचन पाणी आरक्षणास मुदतवाढ देणेबाबतचा प्रस्ताव प्राप्त झालेला आहे. संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये बिगर सिंचन मोठ्या प्रमाणात पाण्याचा हक्क प्रस्तावांना मंजुरी देण्यासाठी क्षेत्रिय वाटपाच्या मर्यादेनुसार सुधारित स्तर निश्चित करण्यात आलेले आहेत. या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.२.३ मधील तरतुदीनुसार पिण्याच्या व औद्योगिक पाणी वापराच्या बिगर सिंचन मोठ्या प्रमाणात पाण्याचा हक्क प्रस्तावांना मान्यता देण्याचे अधिकार मा.मंत्रीमंडळ उपसमितीला देण्यात आले आहेत. या अनुषंगाने शासनास प्राप्त झालेल्या खालील प्रस्तावाला विशेष बाब म्हणून मंजुरी देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

**१.०** मा. मंत्री, जलसंपदा यांचे अध्यक्षतेखाली दि. २२.९.२०२१ रोजी संपन्न झालेल्या मा.मंत्रिमंडळ उपसमितीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार व सदर बैठकीच्या मंजूर इतिवृत्तातील अ क्र. ६ मध्ये नमूद संस्थेला त्यांचे नावासमोर नमूद केलेल्या मोठ्या प्रमाणात पाण्याच्या ( Bulk Water Entitlement) हक्कास, परिच्छेद २.० मधील अटींच्या अधीन राहून विशेष बाब म्हणून मुदतवाढीस मान्यता देण्यात येत आहे.

| संस्थेचेनांव | पाणी वापराचा प्रकार | जलाशय/कालवा/ नदीचेनांव | मंजूर केलेला मोठ्या प्रमाणात पाण्याचा हक्क (Bulk Water Entitlement) (दलघमी) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| भिवंडी निजामपूर शहर महानगरपालिका, ता.भिवंडी, जि.ठाणे | पिण्यासाठी | भातसा जलाशयाच्या निभावणी साठयातून<br>एक विशेष बाब म्हणून सहा वर्षाकरिता | ३१.३५४ |

**२.०** उपरोक्त नमूद प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१३/(४१५/२०१३)/सिंव्य (धोरण), दि. १६/८/२०१४ नुसार जिल्हा परिषदा/ ग्रामपंचायती / नगरपालिका /नगरपंचायती / कटकमंडळे याआर्थिकदृष्टया सक्षम नसल्याने त्यांच्याकडून पिण्याच्या पाणी आरक्षणापोटी सिंचन पुन:र्स्थापना खर्च घेण्यात येवू नये.तसेच शासन निर्णय क्र . संकीर्ण २०१५/(प्र.क्र.२७४/नवि-३३),दि. १७/१२/२०१६ नुसार घरगुती पिण्याच्या पाणी प्रयोजनासाठी राज्यातील क व ड वर्ग महानगरपालिकांच्या बिगरसिंचन आरक्षणाच्या प्रस्तावांस मान्यता देताना सिंचन पुर्नस्थापनेचा खर्च माफ करण्यात यावा .

२. बिगर सिंचन पाणी पुरवठयासाठी करारनाम्याचा सुधारीत नमुना व मार्गदर्शक तत्वे महाराष्ट्र शासन, पाटबंधारे विभाग शासन परिपत्रक क्र. बिपापू १००१/(७१३/२००१)/सिंव्य(धो), मुंबई- ३२, दि. ७/४/२००३ अन्वये निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार करारनामा करण्यात यावा.

३. शासन परिपत्रक क्र. पापव -२०१५६/(प्र.क्र.४००/२०१५)/सिंव्य (महसूल) दि.१५/१२/२०१५ अन्वये बिगरसिंचन पाणी वापराचे करारनामे करणे व नुतनीकरण वेळेवर करणे बाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. जलस्त्रोत प्रदुषित करणाऱ्या पाणी वापरकर्त्याकडून दंडनीय पाणीपट्टी आकारणी करणेबाबत मार्गदर्शक तत्वे या विषयाबाबत शासन निर्णय क्र. पापव २०१५/(प्र.क्र.८८/२०१५)/सिंव्य (महसूल) दि. २१/४/२०१६ मधील अटींचे पालन करणे पाणी वापरकर्त्यांना बंधनकारक राहील.

५. महाराष्ट्र शासन,जलसंपदा विभाग,शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१०/(४०७/१०)/सिंव्य (धोरण), दि. २९/६/२०११ अन्वये करारनामा करताना बिगरसिंचन पाणीवापरकर्ते अंतिम पाणी मागणी प्रमाणे टप्पाटप्पाने पाणीवापर करण्याचे नियोजन नमुद करु शकतील. त्याचप्रमाणे महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाचे आदेश क्र. १/२०१८ मधील तरतुदींनुसार कार्यवाही करण्यात यावी .

६. शासन निर्णय क्र. देवदु २०१५/(८३६/२०१५)/सिंव्य (कामे), दि. १७/११/२०१६ अन्वये पाटबंधारे विकास महामंडळाच्या अधिनियमातील तरतुदीनुसार सिंचन प्रकल्पांचे व्यवस्थापन पाटबंधारे महामंडळाकडे वर्ग करणे व पाणीपट्टीची रक्कम कल्पांच्या सिंचन व्यवस्थापनाच्या कामासाठी खर्च करण्यास मान्यता देणेसाठीचा निर्णय निर्गमित करण्यात आलेला आहे. त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

७. पाणी उचलण्याची/ पुरवठ्याची जागा व क्षेत्रीय परिस्थितीनुसार इतर अटी शर्तीचा अंर्तभाव करून संबधित मुख्य अभियंता यांनी सविस्तर ज्ञापन तात्काळ निर्गमित करावे.

८. "This reservation is only the letter of support for the, water supply scheme or the industry as the case may be. Actual quantity of water that will be supplied every year shall be governed by the entitlement granted to the water user entity by the River Basin Agency based on the population and the reasonable use norm decided by this Authority and the yearly allocation declared by the prescribed Authority on the basis of reservoir contents of the year and shall be subjected to various provisions in the agreement that will be signed by the water user entity with River basin Agency."

९. बहुतेक पाणी पुरवठा योजना सुरु करण्यास आरंभ काळ) Gestation period) लागतो.सर्वसाधारणपणे या कालावधीत संस्था करारनामा करण्यास टाळते अथवा संस्थेसोबत बिगरसिंचन करारनामा केला असला तरीही शासनास कोणतीही पाणीपटटी प्राप्त होत नाही.तथापि संस्थेने पाणी आरक्षण केलेले असल्यामुळे त्याच्याकडून पाणीवापर होत नसूनही ते इतर अर्जदारांना सुध्दा देणे शक्य होत नाही. यामुळे शासनास मोठया महसुलास मुकावे लागते,ही बाब विचारात घेता,अशा पाणी आरक्षण प्रस्तावास मान्यता देतांना,महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण,मुंबई यांनी महाराष्ट्र राज्यासाठी ठोक पाणी प्रशुल्क निकष,भाग ३ मधील परिच्छेद १३.४(पाच)मध्ये नमूद केल्यानुसार कार्यवाही करण्यात येईल.जलसंपदा विभागाशी करारनामा करतांना बिगर सिंचन पाणी वापरकर्ते अतिम पाणी मागणी प्रमाणे टप्प्याटप्याने पाणी करण्याचे नियोजन नमूद करु शकतील.अंतिम पाणी मागणी प्रमाणे पुरवठा सुरु होईपर्यत वर्षनिहाय खालीलप्रमाणे आकारणी करण्यात येईल.

अ) टप्प्यानुसार ठरवून घेतलेल्या प्रमाणात पाणीवापर असल्यास लागू दराने आकारणी.

ब) टप्प्यानुसार ठरवून घेतलेल्या पाणीवापरापेक्षा + १० पाणी वापर (अधिक/कमी) झाल्यास,फरकाच्या वापरास दंडनीय दर लागू दराच्या १.५ पट.

क) उर्वरित प्रमाणाकरिता म्हणजे अंतिम नियोजित पाणी वापर वजा टप्प्यानुसार नियाजित पाणी वापराकरिता,बांधिलकी/लेखबध्दआकार लागू दराच्या ५ % वार्षिक दराने आकारण्यात येईल.

१०) संस्थेने सांडपाण्यावर शुध्दीकरण प्रक्रिया करणारी यंत्रणा बसवावी.तसेच याबाबतच्या सविस्तर प्रस्तावाची माहिती जलसंपदा/पर्यावरण विभागास विहित कालावधीत म्हणजेच करारनामा करतेवेळी देणे आवश्यका राहील, अन्यथा पाणी आरक्षण रदद होईल.

११) संस्थेस प्रथम पाणी वापर करण्यास परवानगीचे इरादापत्र (लेटर ऑफ इंटेन्ट ) देण्यात यावे व करारनामा करण्याकरीता ३ महिन्यांची मुदत ठेवावी.करारनामा झाल्यानंतरच प्रत्यक्ष पाणी परवाना दिल्याचे ग्राहय मानण्यात येईल.संस्थेने सदर करारनामा विहित मुदतीत (३ महिन्यांच्या आत)न केल्यास संस्थेचे पाणी आरक्षण आपोआप रदद होईल.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्धअसून त्याचा संगणक संकेतांक २०२११००८१५४५३१४६२७ असाआहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e2bf9216e9c82a387001366ade405f96dced8f883099a0df6eda6dcc4a3cecb0, serialNumber=64cd9fc7921db221846e464a04d2971a520aa1ed7e728a92a64c735ef2ea7cc9, cn=Vaijnath Manmathappa Chille
Date: 2021.10.08 15:46:32 +05'30'

**(वैजनाथ चिल्ले)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव
४. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
५. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.

७. मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
८. मा.मंत्री यांचे खाजगी सचिव.
९. मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
१०. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
११. अ.मु. सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. सचिव,(प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. कार्यकारी संचालक, कोकण विकास महामंडळ, मुंबई
१५. मुख्य अभियंता (पा) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुंबई
१७. अधीक्षक अभियंता ठाणे पाटबंधारे मंडळ ,ठाणे
१८. निवडनस्ती कार्यासन सिंव्य (धोरण)